विद्यमान शासकीय तंत्रनिकेतनांमध्ये अल्पंसख्यांक विद्यार्थ्यांसाठी दुसरी पाळी सुरु करणे.

सन २०१४-१५ करिता अनुदानाचे वाटप.

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः तंत्रनि-२०१४/प्र.क्र.६९/का.८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

तारीख: २७ नोव्हेंबर, २०१४

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकः उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक : टिईडी-२०१०/( ३३४/ २००९)/ तांशि-५, दि.१३.०९.२०११.

२) शासन निर्णय क्रमांकः उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. टिईडी -२०११/(३४७/२०११)/ तांशि-५, दि.१९.०७.२०१२

३) शासन निर्णय क्रमांकः उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. टिईडी -२०११/(३४७/२०११)/ तांशि-५, दि.८ जुलै, २०१४

४) शासन परिपत्रक क्रमांकः वित्त विभाग, क्रमांक : अंदाज -२०१४/प्र.क्र. ११०/अर्थ-३, दि.०१.०७.२०१४.

५) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचे क्रमांक ९/ नियोजन/ अल्पसंविदुपा/ २०१४/ ३७९ , दि.१७.१०.२०१४ रोजीचे मागणीपत्र.

**शासन निर्णय -**

शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, दि.१३.०९.२०११ अन्वये सन २०११-१२ पासून ठाणे, सोलापूर, जळगाव, नांदेड, यवतमाळ, मुंबई शहर व मुंबई उपनगर या ७, शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, दि.१९.७.२०१२ अन्वये सन २०१२-१३ पासून रत्नागिरी, कराड, ब्रम्हपूरी (चंद्रपूर), जालना, अंबड या ५ व उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या दि.८ जुलै, २०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये सन २०१४-१५ पासून पुणे, लातूर व हिंगोली येथील ३ शासकीय तंत्रनिकेतनामध्ये अल्पसंख्यांक समाजातील विद्यार्थ्यांसाठी दुसऱ्या पाळीत अभ्यासक्रमास मान्यता देण्यात आली आहे.

२. सदर १५ शासकीय तंत्रनिकेतनामध्ये अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांसाठी सुरु करण्यात आलेल्या दुसऱ्या पाळीचा खर्च भागविण्यासाठी “मागणी क्रमांक झेड ई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २००- इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१)(३०) अल्पसंख्यांक विद्यार्थ्यासाठी विद्यमान शासकीय तंत्रनिकेतनामध्ये दुसरी पाळी सुरु करणे, (२२३५ बी ०२२)” या लेखाशीर्षाखाली सन

२०१४-१५ या वर्षाकरिता रु. १०,८०,००,०००/- (अक्षरी रुपये दहा कोटी ऐंशी लाख मात्र) इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे. सदर तरतूदीपैकी ६० टक्के म्हणजेच रु.६.२८ कोटी (अक्षरी रुपये सहा कोटी अठ्ठावीस लाख मात्र) इतकी तरतूद बी.डी.एस. वर उपलब्ध आहे. सदर रक्कमेतून यापूर्वी वितरीत केलेल्या रक्कम वजा जाता उर्वरित निधी याव्दारे वितरीत करण्यात शासन मान्यता देण्यात येत आहे.

उक्त लेखाशिर्षांतर्गत वितरीत करावयाच्या अनुदानाचा तपशिल पुढीलप्रमाणे :-

(रुपये हजारात)

| तपशिलवार लेखाशिर्ष (२२३५ बी ०२२) | अर्थसंकल्पीय तरतूद | बी.डी.एस. प्रणालीवर उपलब्ध तरतूद | दि.०७ जुलै, २०१४ अन्वये वितरीत केलेली तरतूद | या शासन निर्णयाव्दारे ६० टक्के तरतूदीपैकी उर्वरित वितरीत करावयाची तरतूद |
|---|---|---|---|---|
| ०१ वेतन | ४५००० | २६६०० | २१००० | ५६०० |
| २१ सामग्री व पुरवठा | १०८० | ८०० | ५०४ | २९६ |
| २८ व्यावसायिक सेवा | ५७४२० | ३२७१० | २६७९६ | ५९१४ |
| ५२ यंत्रसामग्री व साधनसामग्री | ४५०० | २६९० | २१०० | ० |
| एकूण | १०८००० | ६२८०० | ५०४०० | ११८१० |

३. सदर तरतूद संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्याकडे सूपूर्द करण्यात येत असून याकरिता ते नियंत्रक अधिकारी आणि त्यांनी प्राधिकृत केलेले दुय्यम अधिकारी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील.

४. या योजनेअंतर्गत अल्पसंख्यांक समाजातील विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यात येऊन त्याचा तपशील वेळोवेळी अल्पसंख्यांक विकास विभागास सादर करावा. तसेच सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे व केलेल्या खर्चाचा तपशील व उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी विहित मुदतीत शासनास सादर करावे.

५. सदर रक्कम वितरीत करण्यापूर्वी संबंधित संचालनालय यांनी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/कार्यालयीन आदेश/ वित्तीय नियमावली/सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्यनियमावली/भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांचे निरिक्षण अहवाल/वित्तीय

कार्यपध्दती यांचा अवलंब करावा. तसेच सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील. सदर निधी कोणत्याही संस्थेत ठेव स्वरुपात जमा करता येणार नाही.

६. सदर शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग एक मधील अ.क्र. २७ नियम क्र.१४९ नुसार सर्व अटी व शर्तीचे पालन करुन प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार आणि प्रधान सचिव, यांनी प्रशासनिक विभाग प्रमुख या नात्याने दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४११२७१४१००७५३१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Samir Ramesh Salunkhe

Digitally signed by Samir Ramesh Salunkhe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Samir Ramesh Salunkhe
Date: 2014.11.29 17:25:06 +05'30'

**( समीर साळुंखे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
२. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतने, ठाणे, सोलापूर, जळगाव, नांदेड, यवतमाळ, मुंबई शहर व मुंबई उपनगर, रत्नागिरी, जालना, अंबड, ब्रम्हपूरी, कराड, पुणे, हिंगोली व लातूर.
४. महालेखापाल, लेखापरिक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
५. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, (संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय यांचे मार्फत)
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
९. नियोजन विभाग, का. १४७५,
१०.वित्त विभाग, व्यय-४, अर्थ-३ व अर्थ-१४
११.अवर सचिव (का.७), अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.निवडनस्ती